**अहिल्याबाई होळकर सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक मंडळ, धुळे संचलित ओ.एम.रुपनर माध्यमिक विद्यालय, मुक्ताईनगर, ता.मुक्ताईनगर, जि.जळगांव या शाळेच्या बाभळे, ता.शिंदखेडा, जि.धुळे येथील स्थलांतरास कार्योत्तर मान्यतेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः माशास्थ ३३१८/प्र.क्र.४६६(३)/एसएम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ११ ऑक्टोबर, २०१८

वाचा :

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांकः माशास्थ २०१२/(५९/१२) माशि-२, दिनांक ३१ जुलै, २०१३.**

प्रस्तावना :

अहिल्याबाई होळकर सामाजिक, सांस्कृतिक शैक्षणिक मंडळ, धुळे संचलित ओ.एम.रूपनर माध्यमिक विद्यालय, मुक्ताईनगर, ता.मुक्ताईनगर, जि.जळगांव या मराठी माध्यमाच्या माध्यमिक शाळेचे शासन मान्यतेशिवाय, बाभळे, ता.शिंदखेडा, जि.धुळे येथे स्थलांतर केलेबाबत तक्रार क्षेत्रीय स्तरावर प्राप्त झाली होती. त्याबाबत शाळेस बजावण्यात आलेल्या नोटिशीच्या अनुषंगाने शाळेने स्थलांतरास नव्याने मान्यता द्यावी अशी विनंती केली होती. सदर शाळेच्या स्थलांतर आदेशाबाबत दिनांक ७/०८/२०१८ रोजी झालेल्या बैठकीत, शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धुळे यांना वस्तुस्थितीदर्शक अहवाल सादर करण्याचे निदेश मंत्री, शालेय शिक्षण यांनी दिले होते. संदर्भीय अहवाल शासनास प्राप्त झाला असून त्यावर निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

स्थलांतरीत झालेल्या उपरोक्त शाळेतील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक हित विचारात घेऊन सदर माध्यमिक शाळेचे, वर नमूद ठिकाणी स्थलांतरास खाली नमूद अटी व शर्तीवर कार्योत्तर मान्यता देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

(१) स्थलांतरीत ठिकाणची इमारत विद्यार्थ्यांसाठी सुरक्षित आहे व तेथे आवश्यक भौतिक सुविधा उपलब्ध आहेत याबाबत शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धुळे यांनी खात्री करणे आवश्यक राहील.

(२) सर्व पात्रताधारक शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांना स्थलांतरित ठिकाणी सामावून घेण्यात आले आहे व त्यांच्या सेवाशर्तीमध्ये बदल करण्यात येणार नाही याबाबत संस्थेचे अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टॅम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र घेण्यात यावे.

(३) शाळेसाठी शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशानुसार, शाळेसाठी पक्की इमारत व सर्व भौतिक सुविधा व शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून देण्यात येतील, याबाबत संस्थेचे अध्यक्ष/ सचिवांचे रू.१००/- च्या स्टँम्पपेपरवर नोटरी केलेले शपथपत्र घेण्यात यावे.

(४) स्थलांतरीत शाळेच्या बाबतीत शासन परवानगीच्या व मान्यतेच्या कोणत्याही अटी व शर्तीमध्ये बदल होणार नाही.

(५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, दिनांक २८/०८/२०१५ नुसार विहित केलेल्या संच मान्यतेच्या सुधारित निकषानुसार व याबाबत शासनाकडून वेळोवेळी देण्यात येणाऱ्या आदेशांनुसार अनुज्ञेय होणाऱ्या पदांइतके शिक्षक/शिक्षकेतर कर्मचारी शाळेत कार्यरत राहतील व त्यापेक्षा जास्त शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी कार्यरत राहणार नाहीत हे संस्थेस बंधनकारक राहील. तसेच अनुज्ञेय पदांपैकी रिक्त पदे अतिरिक्त कर्मचाऱ्यांमधून समायोजनाने भरण्याबाबत शासनाच्या धोरणानुसार कार्यवाही करणे आवश्यक राहील.

(६) शाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन/ वेतनेतर अनुदान, विद्यार्थी इ. बाबत शासनाकडून वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, शासन निर्णय, आदेश इ. चे पालन करणे संस्थेस बंधनकारक राहील.

(७) शासन मान्यतेशिवाय शाळेचे स्थलांतरण करण्यात येणार नाही, याची संस्थेने दक्षता घेणे आवश्यक राहील.

(८) हा शासन निर्णय विद्यार्थ्यांच्या सर्वोच्च शैक्षणिक हितास केंद्रस्थानी ठेवून केवळ अपवादात्मक बाब म्हणून घेण्यात येत असून याचा पूर्वोदाहरण म्हणून संदर्भ देता येणार नाही.

२. वरील अट क्र.(१), (२) व (३) ची पूर्तता झाल्यावर, विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक यांनी सदरहू माध्यमिक विद्यालयाच्या स्थलांतरास मान्यता देण्याबाबत आवश्यक पुढील कार्यवाही करावी व केलेल्या कार्यवाहीबाबत शासनास कळविण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१११२१८५३४२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.10.11 12:20:53 +05'30'

**( प्रविण मुंढे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) विभागीय शिक्षण उपसंचालक, नाशिक विभाग, नाशिक
३) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, धुळे
४) अध्यक्ष/सचिव, अहिल्याबाई होळकर सामाजिक, सांस्कृतिक, शैक्षणिक मंडळ, धुळे
५) निवडनस्ती ( एसएम-१)